**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या समस्यांबाबत विचार करुन शासनास उपाय योजना सूचविण्यासाठी समितीची स्थापना करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्रः-मलोआ-२०१०/प्र.क्र.२८१/१०/आठ

सामान्य प्रशासन विभाग,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

दि.१६/०९/२०१०

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या विविध अडीअडचणी व समस्यांबाबत विचार विनिमय करुन शासनास उपाय योजना सूचविण्यासाठी सचिव स्तरावर समिती नियुक्त करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता या संदर्भात साकल्याने विचार करुन या शासन निर्णयान्वये खालील प्रमाणे समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे.

| | |
|---|---|
| १) प्रधान सचिव (सेवा), सा.प्र.विभाग, | अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव., वित्त विभाग, | सदस्य |
| ३) सचिव, विधी व न्याय विभाग, | सदस्य |
| ४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, | सदस्य |
| ५) सह/उप सचिव (सेवा),सा.प्र.वि. | सदस्य सचिव |

या समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे :-

१) भरती प्रक्रिया सुलभ व्हावी व भरती प्रक्रीयेमध्ये येणाऱ्या अडीअडचणी दूर व्हाव्यात यासाठी काय कार्यवाही करता येईल,

२) विविध पदांकरिता संयुक्त स्पर्धा परीक्षा एकत्रित घेता येईल काय,

३) आयोगाच्या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी व मंत्रालयीन अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन श्रेणीतील तफावत दूर करुन आपापसात बदल्या करता येतील काय,

४) बृहमुंबईतील अधिकारी/कर्मचारी व मंत्रालयीन अधिकारी/कर्मचारी यांच्या आपापसात बदल्या करता येतील काय,

५) आयोगाच्या परीक्षेस बसण्यासाठी उमेदवारास जास्तीत जास्त किती संधी देता येतील. याची पडताळणी करणे.

६) अध्यक्षांच्या अनुमतीने उपस्थित करण्यात आलेले अन्य सेवा विषयक मुद्दे.

सदर समितीने शक्यतो तीन महिन्यात आपल्या शिफारसी/अहवाल शासनास सादर करावा.

सामान्य प्रशासन विभाग / कार्या.१२ व ८ कडून समितीस सर्वतोपरी सहकार्य करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(वि.द.आठवले)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रती -

१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा.मुख्य सचिवांचे सचिव, सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई

३) मा.राज्यमंत्री (सा.प्र.) यांचे खाजगी सचिव

४) प्र.स.(सेवा), सा.प्र.विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक

५) प्र.स.,वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक

६) सचिव, विधी व न्याय विभाग, यांचे स्वीय सहायक

७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)

८) सह सचिव (सेवा), सा.प्र.वि.,मंत्रालय,मुंबई

९) अवर सचिव / सा.प्र.वि. १२ व ८,मंत्रालय,मुंबई

१०) कक्ष अधिकारी / सा.प्र.वि. कार्यासन १२ व ८ ,मंत्रालय,मुंबई

११) सर्व मंत्रालयीन विभाग

१२) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने

१३) सामान्य प्रशासन विभाग / कार्या.आठ (निवडनस्ती)

---------